**सामाजिक न्याय विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व निवासी शाळांतील विद्यार्थ्यांसाठी गादी, उशी, उशी कव्हर आणि मच्छरदानी खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२४/प्र.क्र.१४३/शिक्षण-२

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: -१४ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:-** १) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्रमांक:- भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/ भाग- III / उद्योग-४, दि. ०१ डिसेंबर, २०१६.

२) शासन निर्णय, समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य क्रिडा व पर्यटन विभाग, क्रमांक:- बीसीएच-१०८२/९०३८५/(३८) बीसीडब्लू-४, दिनांक १६ मे,१९८४.

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक:- बीसीएच-२०१०/ प्र.क्र.४३०/मावक-४, दिनांक २६ जुलै,२०११.

४) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन परिपत्रक क्र.कापड २०१८/प्र.क्र. ४२/टेक्स ३, दिनांक १८ एप्रिल, २०१८

५) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र. सकआ / शिक्षण/ सो.सु./ गादी, उशी, उशी कव्हर,मच्छरदानी/२४-२५/ का-५ब/ ७३२, दि. ३ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत मागासवर्गीय मुला-मुलींच्या शिक्षणासाठी शासकीय वसतिगृहे व अनुसूचित जाती व नवबौध्द मुला-मुलींच्या शिक्षणासाठी शासकीय निवासी शाळा सुरू करण्यात आलेल्या आहेत. शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना निवास, भोजन व्यवस्था, शैक्षणिक साहित्य, दैनंदिन खर्चासाठी निर्वाह भत्ता तसेच भौतिक सोयी-सुविधा देण्यात येतात. त्यानुषंगाने विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी गादी, उशी, उशी कव्हर आणि मच्छरदानी या वस्तुंची खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्रमांक ५ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना सोयी-सुविधा अंतर्गत गादी, उशी, उशी कव्हर आणि मच्छरदानी या वस्तुंची खरेदी राखीव ठेवण्यात आलेल्या महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्यादीत, मुंबई (महाटेक्स) व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्यादित नागपूर, तसेच ई-निविदा/जेम पोर्टलवरून खरेदी करण्यासाठी खालील रकान्यात नमूद केल्याप्रमाणे एकूण रू. १६,६७,५९,७२७/- (अक्षरी रक्कम रूपये सोळा कोटी सदुसष्ट लाख एकोणसाठ हजार सातशे सत्तावीस फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्यादीत, मुंबई (महाटेक्स) व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांना गादी, उशी, उशी कव्हर आणि मच्छरदानी खरेदी करण्यासाठी द्यावयाच्या एकूण रक्कमेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | वस्तूचे नाव | आकारमान | एकूण मागणी | एका नगाची किंमत | एकूण नगांची किंमत | जीएसटी दर | जीएसटी रक्कम | जीएसटीसह एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | गादी | Foam Mattress + Coir Dimension ७२" ३६" x ४" | १४७७२ | ५५१० | ८१३९३७२० | १८% | १४६५०८६९.६० | ९६०४४५८९.६० |
| | | १२ KG पांढरा कापूस ३ फूट x ६ फूट | ८६३५ | २१३२ | १८४०९८२० | १८% | ३३१३७६७.६० | २१७२३५८७.६० |
| २. | उशी | Cloth- Cotton Weight- २ kg/M Square Dimension-२ ft x १ ft x ४ inch | ३२०६५ | २६६.९४ | ८५५९४३१.१ | १८% | १५४०६९७.६० | १०१००१२८.७० |
| ३. | उशी कव्हर | Dimension- २ ft x १ ft x ४ inch Cloth-Cotton | ५९९०५ | ५७ | ३४१४५८५ | ५% | १७०७२९.२५ | ३५८५३१४.२५ |
| ४. | मच्छरद ानी | ४ फूट x ६ फूट वार्प-२/२०, वेप्ट-६, रिड-१६, पिक्स-७२ | ५००३७ | ६३० | ३१५२३३१० | १२% | ३७८२७९७.२० | ३५३०६१०७.२० |
| **एकूण रक्कम** | | | | | **१४३३००८६६** | | **रू.२,३४,५८,८६१/-** | **रू.१६,६७,५९,७२७/-** |

३.	महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्यादीत, मुंबई (महाटेक्स) व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर यांना गादी, उशी, उशी कव्हर आणि मच्छरदानी खरेदी करण्यासाठी द्यावयाच्या एकूण रक्कमेचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | वस्तुचे नाव | पुरवठा करावयाच्या वस्तुची संख्या व प्रति नग दर | | |
|---|---|---|---|---|
| | | एकूण | प्रति नग किंमत | एकुण किंमत जीएसटीसह |
| १. | गादी | १४७७२ | ५५१० | रू.९,६०,४४,५९०/- |
| २. | | ८६३५ | २१३२ | रू.२,१७,२३,५८८/- |
| ३. | उशी | ३२०६५ | २६६.९४ | रू.१,०१,००,१२९/- |
| ४. | उशी कव्हर | ५९९०५ | ५७ | रू.३५,८५,३१४/- |
| ५. | मच्छरदानी | ५००३७ | ६३० | रू.३,५३,०६,१०७/- |
| एकूण रक्कम जीएसटीसह | | | | रू. १६,६७,५९,७२७/- |

**उपरोक्त खरेदी संदर्भातील अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-**

अ) पुरवठादार संस्थेने पुरवठा करावयाच्या वस्तुंच्या आवश्यकतेनुसार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्याकडे नमुने सादर करावेत. त्यांनी सदर नमुने मंजूर करून ते सबंधित संस्थेकडे द्यावेत.

आ) मालाचा पुरवठा करणाऱ्या पुरवठादाराने सबंधित वसतिगृहाच्या गृहप्रमुख/गृहपाल यांच्याकडे वरील मान्य करण्यात आलेले नमुने दाखवून त्यानुसार मालाचा पुरवठा करावा.

इ) संबंधित गृहप्रमुख/गृहपालांनी पुरवठादाराकडून वस्तु मिळाल्याची पोचपावती आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांचेकडे सादर करावी.

५.	आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भाधीन क्र.४ येथील सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन परिपत्रकानुसार महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या., मुंबई (महाटेक्स) व महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांना ठरवून दिलेल्या कार्यक्षेत्रानुसार वस्तु /साहित्याची खरेदी करावी.

६.	उपरोक्त खरेदी प्रक्रिया करण्याकरिता आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर खरेदीबाबतचा खर्च हा "मागणी क्र. एन -३,

प्रधानशीर्ष - २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, २७७-शिक्षण, (०१) (०६) मागासवर्गीय शैक्षणिक संस्थावरील सोयी-सुविधा वाढविणे (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम) २२२५-३३३१, ३१- सहाय्यक अनुदाने वेतनेतर या उदिष्टाखाली सन २०२४-२५ या वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. सदर आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-2, दिनांक १७.४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.4, परि. क्र. 27 (2) (अ), भाग-पहिला, उपविभाग-2, अ.क्र.२७ अ, नियम क्र.७६, अ.क्र. ३७, नियम क्र.९०, अ.क्र.४५, नियम क्र.१६९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१४१६५३११४७२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA VIJAYSINH DESHMUKH

Digitally signed by PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a2dd85b17cd3d5311cdc96ff87ec7bb1ccc64c56294fd60222073f2bd8dec000, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3D331EE44AE91C7D48D9B9DBBF7B7A7264F269283FAC405332FED75CFA968E89, cn=PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
Date: 2025.02.14 16:54:38 +05'30'

**( प्र. वि. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
११) महालेखापाल (लेखा परिक्षा),/(लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१३) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग (प्रादेशिक) (सर्व)
१४) सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग (सर्व)
१५) सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मुंबई मंत्रालय, मुंबई.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१७. निवडनस्ती-शिक्षण-२